**सामान्य राज्य सेवा गट-अ मधील वरीष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सुक्ष्मजीव शास्त्रज्ञ) या पदावर तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-११२३/प्र.क्र.३५०/सेवा-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०९ एप्रिल, २०२५

**शासन आदेश:-**

सन २०२२-२३ या निवडसूची वर्षात सामान्य राज्य सेवा, गट-ब मधील “मुख्य अणुजीव शास्त्रज्ञ ” (वेतनस्तर एस-१५ : ४१८००-१३२३००) या संवर्गात कार्यरत खालील तक्त्यातील अधिकारी यांना सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील “वरीष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सुक्ष्मजीव शास्त्रज्ञ)” (वेतनस्तर एस-२० : ५६१००-१७७५००) संवर्गातील पदोन्नती कोट्यातील रिक्त पदावर या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील “स्तंभ-४” मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.चंद्रवर्धन जी.परुळकर,<br>मुख्य अनुजीव शास्त्रज्ञ,<br>सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, नागपूर | अ.जा. | वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सुक्ष्मजीव), पुणे |

२. सदर पदोन्नती सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील “वरीष्ठ वैज्ञानिक अधिकारी (सुक्ष्मजीव शास्त्रज्ञ)” या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहे.

३. मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निकालाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब च्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी **एक महिन्याच्या** आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल उप सचिव (सेवा-२), सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई व संचालक, आरोग्य सेवा(१), मुंबई यांना सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

७. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्त्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ त्यांना देण्यात आला असल्यास तो काढून घेण्यात येईल. तसेच, अधिकाऱ्यांनी पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल. या प्रकरणी संबंधीत उपसंचालक, आरोग्य सेवा यानी संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०९११२३५४०९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C71DE18A037CE1808BB4E1BA5462D93EB69C5FEB96700EDA8ADF1B3C9C753F8, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2025.04.09 11:45:07 +05'30'

( व.पां.गायकवाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व).
५. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
६. उप संचालक, आरोग्य सेवा, (सर्व)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे
१०. मा. मंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा. राज्यमंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (१), सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१३. सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१४. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव (सेवा-१), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांचे मार्फत)
१७. निवडनस्ती सेवा-२